**कृषि आयुक्तालयाच्या अधिनस्त अधिकारी/ कर्मचाऱ्यांच्या वैद्यकीय खर्चाच्या प्रतिपूर्तीस मान्यता देण्याकरिता अधिकार प्रत्यार्पित करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**कृषि, पशुसंवर्धन,दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : कृषिआ-२११८/प्र.क्र.३२३/१६-अे**
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक : १७ नोव्हेंबर, २०१८.

**वाचा :-** सार्वजनिक आरोग्य विभाग, शासन निर्णय, क्र.वैखप्र-२०१६/प्र.क्र.१६/२१०६/राकावि २/ दि.१६ मार्च, २०१६.

**प्रस्तावना :-**

शासकीय कर्मचारी व त्यांच्या कुटूंबियांना महाराष्ट्र राज्य सेवा (वैद्यकीय देखभाल) नियम १९६१ मधील तरतुदींच्या अधिन राहून, आकस्मिक उद्भवणाऱ्या २७ आजारांवर खाजगी रुग्णालयात घेतलेल्या उपचारांवरील तसेच ५ गंभीर आजारांवर, शासनाने संपूर्ण खर्चाच्या प्रतिपूर्तीसाठी मान्यता दिलेल्या खाजगी रुग्णालयात घेतलेल्या उपचारांवरील वैद्यकीय खर्चाच्या प्रत्येक प्रकरणी रु.३ लाखाच्या कमाल मर्यादेत प्रतिपूर्तीस मंजूरी देण्याचे अधिकार विभाग प्रमुख म्हणून आयुक्त (कृषि) यांना आहेत. सदर मर्यादेवरील वैद्यकीय खर्चाच्या प्रतिपूर्तीचे प्रस्ताव मंजूरीसाठी कृषि विभाग, मंत्रालय, मुंबई यांच्याकडे सादर केले जातात. सद्य:स्थितीत कृषि विभागातील ८ विभागीय कृषि सह संचालक कार्यालयातून आयुक्त (कृषि) कार्यालयाकडे प्राप्त होणाऱ्या देयकांची संख्या मोठया प्रमाणावर वाढलेली आहे. कृषि विभागातील अधिकारी/कर्मचारी यांची संख्या २७ हजाराहून अधिक आहे. क्षेत्रिय कार्यालयाकडून प्राप्त झालेली वैद्यकीय देयके मंजूरीसाठी बराच कालावधी लागत असल्याने संबंधित अधिकारी/कर्मचारी यांना प्रतिपूर्तीची रक्कम मिळण्यास उशिर होतो. या अनुषंगाने कृषि आयुक्तालयाच्या अधिनस्त अधिकारी/कर्मचाऱ्यांच्या रु.१ लाख मर्यादेपर्यंतच्या वैद्यकीय खर्चाच्या प्रतिपूर्तीस मान्यता देण्यासाठी संबंधित विभागीय कृषि सह संचालक यांना अधिकार प्रदान करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. त्यानुसार शासनाने आता पुढील निर्णय घेतला आहे.

**शासन निर्णय:-**

कृषि आयुक्तालयाच्या अधिनस्त अधिकारी/कर्मचाऱ्यांच्या रु.१ लाख मर्यादेपर्यंतच्या वैद्यकीय खर्चाच्या प्रतिपूर्तीस मान्यता देण्यासाठी संबंधित विभागीय कृषि सह संचालक (वेतनश्रेणी रु.१५,६००-३९,१०० अधिक ग्रेड वेतन रु.७६००) यांना विभाग प्रमुख म्हणून घोषित करण्यात येत आहे. सदर अधिकार केवळ उपरोक्त वित्तीय बाबीपुरतेच मर्यादित राहतील.

२. हा शासन निर्णय प्रलंबित प्रकरणांना देखील लागू राहील.

३. शासन याद्वारे असे निर्देश देत आहे की, वर नमूद केल्याप्रमाणे विभागप्रमुख या स्तरावर प्रकरणांना मंजूरी देताना महाराष्ट्र राज्य सेवा (वैद्यकीय देखभाल) नियम, १९६१ व त्यानंतर वेळोवेळी निर्गमित केलेल्या शासन निर्णयामधील तरतुदी काटेकोरपणे तपासून मंजूरी देण्यात यावी.

४. प्रस्तुतचे अधिकार वित्त विभाग, शासन निर्णय, क्रमांक:विअप्र-२०१३/प्र.क्र.३० /२०१३/ विनियम, भाग-२, दि.१७.४.२०१५ अन्वये प्रसिध्द केलेल्या वित्तीय अधिकार नियम पुस्तिका १९७८, भाग पहिला,उपविभाग एक मधील नियम २ अन्वये प्रशासकीय विभागास असलेल्या अधिकारांन्वये प्रदान करण्यात येत आहे.

५.   सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक क्रमांक २०१८१११७१७१७३५३३०१ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Sugriv Sambhaji Dhapate

Digitally signed by Sugriv Sambhaji Dhapate
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Agriculture And ADF Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=d02297f9b5e889636956e39bfae4ea112e908c0e9a7e572d4190f9709a817f51, serialNumber=fc102de27dc1b41e747ac6cbb491c4209459c3cf340720ea98fd1d95b19c9f65, cn=Sugriv Sambhaji Dhapate
Date: 2018.11.17 17:24:10 +05'30'

**( सु. सं. धपाटे )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

आयुक्त (कृषि), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.

**प्रत :**

१. मा.मंत्री (कृषि), यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई,
२. मा.राज्यमंत्री (कृषि), यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई,
३. मा.सचिव (कृषि), यांचे स्वीय सहायक, कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई,
४. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), (लेखा परीक्षा), महाराष्ट्र, मुंबई/ नागपूर,
५. सर्व संचालक, कृष आयुक्तालय, पुणे,
६. सर्व विभागीय कृषि सह संचालक/ जिल्हा अधिक्षक कृषि अधिकारी, (द्वारा आयुक्त (कृषि) पुणे),
७. कृषि सह संचालक (आस्थापना), कृषि आयुक्तालय, पुणे,
८. संबंधित जिल्हा कोषागार अधिकारी, (द्वारा आयुक्त (कृषि) पुणे),
९. संबंधित उप विभागीय कृषि अधिकारी, (द्वारा आयुक्त (कृषि) पुणे),
१०. संबंधित तालुका कृषि अधिकारी, (द्वारा आयुक्त (कृषि) पुणे),
११. सर्व संबंधित अधिकारी, (द्वारा आयुक्त (कृषि) पुणे),
१२. निवड नस्ती.